शासकीय तंत्रनिकेतनातील विभाग प्रमुख यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करुन नियुक्ती पुढे सुरु ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन आदेश क्र. पकास-३४१९/प्र.क्र.८२/१९/तांशि- ७
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :-२२ ऑक्टोबर, २०२१.

संदर्भ :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.परिवि-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.२९/०२/.२०१६
२) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. ४अ/आस्था/ परिविक्षा / २०१९/४०९, दि. ९/०८/२०१९ व पत्र क्र.४अ/ आस्था/ परिविक्षा/२०२१/१०३, दि.२३/०२/२०२१

**शासन आदेश-:**

शासकीय तंत्रनिकेतनामधील, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट - अ, या संवर्गातील विभाग प्रमुख यांची दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीकरीता नियुक्ती करण्यात आली आहे. सदरचा कालावधी पूर्ण झाल्याने त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबतचा प्रस्ताव प्रस्ताव संदर्भ क्र.२ येथील पत्रांन्वये प्राप्त झाला आहे.

०२. शासन सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासंदर्भातील संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयातील अटींची पूर्तता संबंधितांचे प्रकरणी होत असल्याने त्यांचा परिविक्षाधीन कालावधी खालील तक्त्यात स्तंभ क्र.६ मध्ये नमुद केलेल्या दिनांकापासुन समाप्त करण्यात येत आहे व त्यांची सेवा स्तंभ क्र. ७ मध्ये नमूद केलेल्या दिनांकापासून नियमितपणे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अध्यापकाचे नाव व पदनाम | नियुक्ती आदेश दिनांक | रुजू झाल्याचा दिनांक | परिविक्षा कालावधीतील रजेचा कालावधी | परिविक्षा कालावधी पूर्ण केल्याचा दिनांक | नियुक्ती पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री.सुनिलकुमार लक्ष्मणराव अंधारे, विभाग प्रमुख, यंत्र अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, नंदुरबार | शा.नि.क्र.ससेनि-३२१५/प्र.क्र.४५१/१५, तांशि-७, दि.०६/०८/२०१६ | १२/०८/२०१६ (म.पू.) | निरंक | ११/०८/२०१८ (म.नं.) | १२/०८/२०१८ (म.पू.) |
| २ | श्री.चंद्रकांत यलगुरदरय्या सिमिकेरी, विभाग प्रमुख, यंत्र अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, नाशिक | शा.नि.क्र.ससेनि-३२१५/प्र.क्र.४५१/१५, तांशि-७, दि.०६/०८/२०१६ | २६/०८/२०१६ (म.पू.) | ०२ दिवस | २७/०८/२०१८ (म.नं.) | २८/०८/२०१८ (म.पू.) |

| अ. क्र. | अध्यापकाचे नाव व पदनाम | नियुक्ती आदेश दिनांक | रुजू झाल्याचा दिनांक | परिविक्षा कालावधीतील रजेचा कालावधी | परिविक्षा कालावधी पूर्ण केल्याचा दिनांक | नियुक्ती पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| ३ | श्री.सुनिल बाला वेस्ली, विभाग प्रमुख, यंत्र अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, जळगांव | शा.नि.क्र.ससेनि-३२१५/प्र.क्र.४५१/१५, तांशि-७, दि.०६/०८/२०१६ | ०१/०९/२०१६ (म.पू.) | १० दिवस | १०/०९/२०१८ (म.नं.) | ११/०९/२०१८ (म.पू.) |

०३. संबंधित संस्था प्रमुखांनी उक्त विभाग प्रमुखांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने उचित कार्यवाही तातडीने करावी.

०४. सदर शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवि-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.२९ फेब्रुवारी, २०१६ मधील तरतुदीन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.परिवि/ २७१५/ प्र.क्र.२०३/आठ, दि. २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२२१७०१०२४८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAMEER LAXMAN DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, pseudonym=B0341853BBBDA46EBB328D4BE0F460D863592476, serialNumber=6EE64CF9B42881125C3715A5DB341B5827C5743C728BC85F04BB71FF8FC154D6, cn=SAMEER LAXMAN DHERE
Date: 2021.10.22 17:06:15 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :**

संबंधित विभाग प्रमुख (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत).

**प्रति,**

१) संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) सह संचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, नाशिक,
३) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, नंदूरबार/नाशिक/जळगाव,
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नंदूरबार/नाशिक/जळगाव,
६) निवड नस्ती/तांशि-७.